कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यंत्रणेतील कौशल्य विकास रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन अधिकारी, गट-ब या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या नियतकालिक बदल्या-२०२३.

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य ,रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**
**क्रमांक : बदली-२०२३/प्र.क्र.१५० /प्रशा-२ (रोजगार)**
मंत्रालय (मुख्य इमारत), दालन क्र.२०४, २ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २८ जून, २०२३

**शासन आदेश** :-

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांचे बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(१), ४(२) व ४(३) मधील तरतुदीनुसार नियतकालिक व उक्त अधिनियमाच्या कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदीनुसार नियतकालिक बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने आयुक्त,कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यंत्रणेतील **कौशल्य विकास रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन अधिकारी, (गट-ब) या** संवर्गातील खालील तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांची नियतकालिक बदली त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक ४ मध्ये दर्शविलेल्या कार्यालयात करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्या कार्यरत असलेले कार्यालय | बदली करण्यात आलेले कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | श्री. र. स. मोरे | कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, नवी मुंबई. | जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, मुंबई शहर. (रिक्त पदी) |
| २ | श्री. ह.श्री.नलावडे | जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, पुणे | जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, सोलापूर (रिक्त पदी) |
| ३ | श्री.अ.स.ठाकरे | आदिवासी कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, अचलपूर | जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, अमरावती (रिक्त पदी) |
| ४ | श्री.सा.बा.मोहिते | कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभागीय आयुक्तालय, पुणे | जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, मंचर, पुणे (रिक्त पदी) |
| ५ | श्री. रविकुमार म. पंतम. | जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, अहमदनगर | जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र,कळवण . (रिक्त पदी) |
| ६ | श्री.स.ज्ञा.गायकवाड | जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र,नाशिक | जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, मुंबई शहर. (रिक्त पदी) |
| ७ | श्री.ग.प्र.बिटोटे | जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र,रत्नागिरी | जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, अकोला (रिक्त पदी) |
| ८ | श्री.भु.रा.रिठे | जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र,औरंगाबाद | जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, जालना (रिक्त पदी) |

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येत असून आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय यांनी उपरोक्त अधिकाऱ्यांना बदलीने पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रुजू होण्यासाठी कार्यमुक्त करण्यात यावे.

३. सदर बदली नियतकालिक बदल्या असल्याने त्यांना प्रवास भत्ता, दैनंदिन भत्ता अनुज्ञेय राहील.

४. संबंधित अधिकारी बदलीने पदस्थापनेच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबतचा अहवाल शासनास त्वरीत सादर करावा.

५. बदली झालेल्या अधिकारी यांनी त्यांची बदली रद्द करणे अथवा त्यासाठी प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्षरित्या दबाव आणल्यास ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे सदर कृती गैरवर्तणूक समजून त्यांच्याविरुध्द शिस्तभंगविषयक कार्यवाही करण्यात येईल.

६. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी) स्वियेतर सेवा आणि निलंबन, बडतफी व सेवेतून काढून टाकणे) नियम, १९८१ मधील नियमानुसार दिलेल्या विहीत पद अवधी कालावधीत सबंधित अधिकारी यांनी बदलीच्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू होण्याची दक्षता घ्यावी अन्यथा या पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास,त्याचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन म्हणून गणला जाईल. याची बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी.

७. वरीलप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांना पूर्व परवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करु नये व महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार मुळ कार्यालयाने बदलीने पदस्थापना झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते सबंधित अधिकाऱ्यांना मुळ पत्त्यावर नोंदणीकृत डाकेने परत करावेत.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०६२८२१२३४१७९०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRABHAKAR A SANKHE

Digitally signed by PRABHAKAR A SANKHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT ENTREPRENEURSHIP AND EMPLOYMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=1bac9385344f87e77e1084162b6716914d02e353160fac64808fec76c25d6d90, pseudonym=11AF006A9B8244D291C83FCA56E433781EE9E76C, serialNumber=2F853CAC13002D53D7034663C6F0D48D3ADE65B7222B4D38B6E5902DB13A4750, cn=PRABHAKAR A SANKHE
Date: 2023.06.28 21:25:19 +05'30'

**( प्रभाकर संखे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा.प्रधान सचिव, कौशल्य , रोजगार व उद्योजकता नाविन्यता विभाग यांचे स्वीय सहायक
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
४. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, नवी मुंबई
५. संबंधित उप आयुक्त , कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता (कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालयामार्फत)
६. संबंधित सहायक आयुक्त , कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता (कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालयामार्फत)

७. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई (कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालयामार्फत)

८. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी/उप कोषागार अधिकारी (कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालयामार्फत)

९. संबंधित **कौशल्य विकास रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन अधिकारी, (गट-ब)** (कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालयामार्फत)

१०. निवड नस्ती.